**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,शहापूर यांच्या कार्यक्षेत्रातील २ शासकीय आश्रमशाळांच्या इमारत बांधकामाचे अंदाजपत्रके व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.६०३/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०११.

**वाचा** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.अशा.जा.क्र.का-३/इमा/५५/२०१०, दि.२०/०७/२०१०.
२) शासनाचे पत्र क्र.बैठक-२०१०/प्र.क्र.३५५/का.१३, दि.३/८/२०१०.
३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र .शाआवबां- २०१०/ प्र.क्र.२४/ का.८(२) दिनांक १२ नोव्हेबंर, २०१०.
४) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचा शासन निर्णय क्र:मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र.३४/३९, दि.६/८/२०१०.

**प्रस्तावना** : आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी त्यांच्या संदर्भ दि.१२/११/२०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर यांच्या कार्यक्षेत्रातील खालील तक्त्यात दर्शविलेल्या २ शासकीय आश्रमशाळांचे इमारत संकुल बांधकाम करण्याबाबत अंदाजपत्रके व आराखडे इत्यादींसह प्रशासकीय मान्यतेसाठी सविस्तर प्रस्ताव शासनास सादर केले आहे.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | तालुका | जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | शहापूर | खुटल | मुरबाड | ठाणे | ६,८१,२०,५४१/- |
| २ | | मढ | मुरबाड | ठाणे | ८,१८,३४,६०८/- |

सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने उपरोक्त तक्त्यातील शासकीय आश्रमशाळेचे सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आले होते.

२. सदर सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग,मुरबाड यांनी तपासले आहे. तसेच

प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर, कार्यकारी अभियंता,ठाणे सार्वजनिक बांधकाम विभाग,ठाणे व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे यांनी साक्षांकित केली आहेत.सदर अंदाजपत्रके सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारीत असुन अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक सहमती दिलेली आहे. सदर प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** : प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा खुटल, मढ ता. मुरबाड, जि.ठाणे येथील इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकातील सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सूचविल्याप्रमाणे ४ % आकस्मिक खर्च व ११% विद्युतीकरणाची तरतूद योग्य करण्यात आली आहे. अंदाजपत्रकातील १०% दरवाढीची तरतूद वगळून पुढील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या अंदाजपत्रकीय रक्कमेस खालील **(अ), (ब) व (क)** येथील अटींच्या आधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. मात्र **<u>सदर बांधकामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकाम सुरु करु नये</u>**.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | तालुका | जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | शहापूर | खुटल | मुरबाड | ठाणे | ६,१९,२७,६०४/- |
| २ | | मढ | मुरबाड | ठाणे | ७,५५,५९,६३३/- |

**<u>अटी :-</u>**

**(अ)** काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच वापरावयाच्या नमुना नकाशास व विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

**(ब)** काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

**(क)** ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०११०१२४१७४४४३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास द.भंडलकर )
उप सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
श्री.सी.डी.वाघ,कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगांव (समन्वय अधिकारी)
कार्यकारी अभियंता, ठाणे. सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, मुरबाड, जि.ठाणे.
कक्ष अधिकारी (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.